**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय (टेंबा रुग्णालय) शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मिभाम-१११६/प्र.क्र. ६८/२०१६/नवि-२८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- ३०/११/२०१६

**संदर्भः-** १) मिरा-भाईंदर महानगरपालिका महासभा ठराव क्र.१२, दि.१४/१२/२०१२.
२) मिरा-भाईंदर महानगरपालिका महासभा ठराव क्र.३०, दि.२१/०९/२०१३

**प्रस्तावनाः-**

मिरा-भाईंदर हे मुंबई महानगर प्रदेशामधील मुंबई शहरालगतचे शहर असून ते मुंबई शहराच्या उत्तरेकडे स्थित आहे. सन २०११ च्या जनगणनेनुसार मिरा-भाईंदर महानगरपालिका क्षेत्राची लोकसंख्या ८.१४ लक्ष इतकी आहे. तर त्यालगतच्या वसई-विरार शहर महानगरपालिका क्षेत्राची लोकसंख्या १२.२२ लक्ष एवढी आहे. यामध्ये निम्न-मध्यमवर्गीय नागरिकांचा मोठ्या प्रमाणात समावेश आहे. चर्चगेट ते डहाणू या रेल्वे मार्गावर, तसेच मुंबई-अहमदाबाद (घोडबंदर ते तलासरी) या राष्ट्रीय महामार्गावर शासनाचे वा महानगरपालिकेचे एकही सुसज्ज रुग्णालय नाही. त्यामुळे या परिसरातील गोरगरीब रुग्णांना भगवती रुग्णालय किंवा बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या इतर मोठ्या रुग्णालयांकडे वैद्यकीय उपचाराकरीता जावे लागते. मिरा-भाईंदर आणि वसई-विरार शहराची वाढती लोकसंख्या विचारात घेता, या परिसरातील नागरिकांना चांगल्या प्रतीच्या आरोग्य सुविधा उपलब्ध होणे आवश्यक आहे.

मिरा-भाईंदर महानगरपालिकेकडून २०० खाटांच्या क्षमतेचे भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय बांधण्यात आले असून हे रुग्णालय टप्प्याटप्प्याने चालू करण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे. सदर रुग्णालय पुर्णपणे चालविण्या इतपत महानगरपालिकेची आर्थिक क्षमता नसल्याने या रुग्णालयाचा वापर पुरशा कार्यक्षमतेने होवू शकत नाही. सदर रुग्णालय राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत केल्यास त्या विभागाकडील सक्षम वैद्यकीय यंत्रणेच्या माध्यमातून रुग्णालयाच्या सेवा व वैद्यकीय उपचाराच्या दर्जात लक्षणीय सकारात्मक बदल होण्यास मदत होईल. त्याचप्रमाणे महानगरपालिकेच्या रुग्णालयावरील खर्चात कपात होऊन हा निधी महानगरपालिकेकडून देण्यात येणाऱ्या अन्य आवश्यक नागरी सुविधांकरीता उपलब्ध होऊ शकेल. मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने संदर्भाधीन दि.१४/१२/२०१२ व दि.२१/०९/२०१३ च्या ठरावांन्वये सदरचे रुग्णालय राज्य शासनाकडे हस्तांतरीत करण्याबाबत ठराव पारित केला आहे. या पार्श्वभूमीवर मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मालकीचे भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय (टेंबा रुग्णालय) राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर मंत्रिमंडळाच्या दि.२७/०९/२०१६ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार मिरा-भाईंदर महानगरपालिकेचे भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय (टेंबा रुग्णालय) राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून हस्तांतरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहेः-

(१) मिरा-भाईंदर महानगरपालिकेचे भारतरत्न पंडित भीमसेन जोशी रुग्णालय, भाईंदर (पश्चिम) या रुग्णालयाचा मालकी हक्क, संबंधित भुखंड व त्यावरील इमारती आणि त्यामधील

यंत्रसामग्रीसह (आर्थिक दायित्व वा बोजाविरहित) राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(२) सदर रुग्णालयात सेवारत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांचे शासनाकडे पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहेः-

(अ) पात्र वैद्यकीय कर्मचारी/अधिकारी यांच्याकडून समावेशनाच्या अनुषंगाने विकल्प मागविण्यात यावा. ज्यांचे विकल्प प्राप्त होतील त्यांचा समावेशनासाठी विचार करावा.

(ब) सदर रुग्णालयासाठी आकृतीबंध मंजूर आहे. या आकृतीबंधानुसार एकूण ३५ वैद्यकीय कर्मचारी/अधिकारी सध्या कार्यरत आहेत. रुग्णालयासाठी नियुक्त करण्यात आलेल्या वैद्यकीय कर्मचारी/अधिकाऱ्यांचा, आकृतीबंधामध्ये नमूद केलेल्या पदांच्या मर्यादेत समावेशन करण्यात यावे.

(क) ज्या अधिकाऱ्यांचे/कर्मचाऱ्यांचे समावेशन करावयाचे आहे, त्यांच्या नियुक्त्या विहित मार्गाने जाहिरात देऊन, परिक्षा घेऊन/निवड समितीमार्फत व त्यांच्यासाठी विहित केलेल्या सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार त्यांची निवड झालेली असावी.

(ड) संबंधित वैद्यकीय कर्मचारी/अधिकारी यांचे शासनाकडील ज्या संवर्गात समावेशन करावयाचे आहे. अशा संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमानुसार ते पात्र ठरणे आवश्यक राहील.

(इ) ज्या दिनांकास संबंधित वैद्यकीय कर्मचारी/अधिकारी यांचे ज्या संवर्गात समावेशन होईल तो दिनांक त्यांचा संबंधित संवर्गात ज्येष्ठतेचा दिनांक धरण्यात येईल. याबाबत त्यांना अवगत करण्यात यावे.

(ई) ज्या दिनांकास अशा वैद्यकीय अधिकाऱ्यांचे समावेशन होईल तो दिनांक त्यांचा शासकीय सेवेतील नियुक्तीचा दिनांक समजण्यात येईल.

(फ) जे वैद्यकीय कर्मचारी/अधिकारी उपरोक्त अटीनुसार समावेशनास पात्र नसतील त्यांच्या सेवा महानगरपालिकेकडे राहतील.

(३) रुग्णालयाच्या हस्तांतरणाच्या पार्श्वभूमीवर सदर रुग्णालयात सेवारत असलेल्या वैद्यकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शासनाच्या सेवेतील समावेशनाबाबत कार्यवाही करण्याकरीता ६ महिन्याचा कालावधी लागण्याची शक्यता असल्याने त्याबाबतची कार्यवाही सार्वजनिक आरोग्य विभागाने या ६ महिन्यात करावी. त्यानुसार ६ महिन्यापर्यंतच्या वेतनाची अदायगी महानगरपालिकेने करावी. त्यानंतरच्या वेतनाची अदायगी सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत करण्यात यावी.

(४) रुग्णालयाच्या हस्तांतरणानंतर या रुग्णालयावरील संपूर्ण खर्च राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत करण्यास व त्याकरीता येणाऱ्या वार्षिक रु.२५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी) इतक्या आवर्ती खर्चाकरीता अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(५) सदर रुग्णालयाच्या हस्तांतरणाचा निर्णय झाल्यानंतर त्या निर्णयाची अंमलबजावणी ६ महिन्यांच्या कालमर्यादेत आणि परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, उपसंचालक, आरोग्य सेवा, ठाणे आणि उप आयुक्त (आरोग्य), मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचा समावेश असलेली समिती गठीत करण्यात येत आहे.

०२. उपरोक्त परिच्छेदात नमूद करण्यात आल्यानुसार रुग्णालय शासनाकडे हस्तांतरीत करण्याबाबतची व रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी वर्ग शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबतची कार्यवाही विहित मुदतीत करण्यात यावी.

०३. सदरहू शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, सामान्य प्रशासन विभाग, विधि व न्याय विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०१४३०५९८८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.30 14:33:30 +05'30'

(ज. ना. पाटील)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई - ४०० ०१८.
८) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई-४०० ६१४.
९) जिल्हाधिकारी, ठाणे.
१०) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
११) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा-ठाणे.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-ठाणे.
१३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
१४) महालेखापाल ½, महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१५) उपसचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) उपसचिव, वित्त विभाग (व्यय-३), (विसु-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७) उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९) निवडनस्ती (नवि-२८).